चंद्रपूर वनवृत्तातील सहाय्यक वनसंरक्षक (तांत्रिक), चंद्रपूर व वनक्षेत्रपाल (तांत्रिक), ब्रम्हपूरी ही पदे बांबु संशोधन केंद्र, चिचपल्ली येथे स्थानांतरीत करण्याबाबत..

# महाराष्ट्र शासन
## महसूल व वन विभाग
## शासन आदेश क्र. एमएफएस- २०१८ /प्र.क्र.९६/फ-८

मादाम कामा मार्ग,हूतात्मा चौक
मंत्रालय,मुंबई -४०० ०३२.
दिनांक : ११ ऑक्टोंबर, २०१८.

वाचा - १) शासन निर्णय महसूल व वन विभाग क्र.इएसटी-२०१३/प्र.क्र.६४/फ- ९, दि.४/१२/२०१४.
२) अपर प्रधान मुख्य वन संरक्षक ( कार्मिक) ,महाराष्ट्र राज्य नागपूर यांचे पत्र क्र.प्रशिक्षण/ बांबू/ चिचपल्ली/प्र.क्र.५/१४-१५/३४४६/कक्ष-९ दि.७/०३/२०१८.

**शासन आदेश -**

बांबू हे अत्यंत महत्वाचे वनोपज असून, वनालगत असलेल्या ग्रामीण व आदिवासी जीवनात बांबूचे महत्वाचे स्थान आहे. वनालगत असलेल्या ग्रामीण व आदिवासी लोकांची उपजिविका बांबू व बांबूवर आधारीत लघुउद्योगावर अवलंबून असते. नैसर्गिक व खाजगी क्षेत्रात बांबू लागवड व योग्य व्यवस्थापन करुन बांबूचे उत्पादनामध्ये तसेच बांबूवर आधारीत उद्योजकांना चालना देणे व बांबूचा मुल्यवर्धीत उपयोग वाढविणे यासाठी शासन आदेश दि.०४/१२/२०१४ अन्वये नविन बांबू धोरण जाहिर करण्यात आले आहे. या धोरणाची व्यापक अंमलबजावणी करण्याकरीता चिचपल्ली, जि.चंद्रपूर येथे बांबू संशोधन व प्रशिक्षण केंद्राची स्थापना करण्यात आली आहे. सदरहू केंद्रामार्फत बांबूवर आधारीत विविध प्रशिक्षण विषयक कार्यक्रम राबविण्यात येत आहेत. सदर केंद्राची स्थापना करण्यासाठी विविध संवर्गातील २३ वदे मंजूर करण्यात आली आहेत. तथापि या केंद्रामार्फत राबविण्यात येणाऱ्या प्रशिक्षण कार्यक्रमावर नियंत्रण ठेवण्यासाठी संचालक, बांबू संशोधन व प्रशिक्षण केंद्र, चिचपल्ली यांना सहायक अधिकारी यांची आवश्यकता भासत आहे. सदर प्रकल्प बहुउद्देशीय असून चंद्रपूर सारख्या आदिवासी बहुल जिल्ह्यामध्ये रोजगार निर्मितीसाठी अनुकुल असा प्रकल्प आहे. त्यामुळे सदर केंद्राचे काम जलदगतीने पूर्ण होणे आवश्यक आहे.

बांबू संशोधन व प्रशिक्षण केंद्र, चिचपल्ली येथील प्रशासकीयदृष्टया कामाची निकड विचारात घेता तसेच बांबू धोरणाची व्यापक अंमलबजावणी करण्याकरीता सहाय्यक वन संरक्षक (तांत्रिक), चंद्रपूर व वनक्षेत्रपाल (तांत्रिक), ब्रम्हपूरी ही दोन पदे बांबू संशोधन व प्रशिक्षण केंद्र, चिचपल्ली येथे स्थानांतरीत करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेताक २०१८१०१११४३२३७३८१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Atul Ashok Kode

Digitally signed by Atul Ashok Kode
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Revenue and Forest Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=a12403ed93b05957cb29b7e95265d3ac52d366233b80405514f23a879132aeec, serialNumber=f0d5ee4c99cc9cbfa8761b3ddc7bd6650bad33302f33a35400ad5aad2291371a, cn=Atul Ashok Kode
Date: 2018.10.11 14:38:10 +05'30'

**(अतूल कोदे)**
**सह सचिव (वने)**
**महसूल व वन विभाग**

**प्रत-**

१) प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन बल प्रमुख), महाराष्ट्र राज्य,नागपूर.
२) प्रधान मुख्य वनसंरक्षक (संशोधन, शिक्षण व प्रशिक्षण), म.रा., पुणे
३) अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (कार्मिक), नागपूर.
४) अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (प्रशासन - दुय्यम संवर्ग), नागपूर.
५) मुख्य वनसंरक्षक (प्रादेशिक ) चंद्रपुर
६) संचालक, बांबू संशोधन व प्रशिक्षण केंद्र, चिचपल्ली
७) महालेखापाल,महाराष्ट्र-२ (लेखा परीक्षा/लेखा व अनुज्ञेयता),महाराष्ट्र २ नागपूर
८) जिल्हा कोषागार अधिकारी, कोषागार कार्यालय, चंद्रपूर
९) मा.मंत्री (वने) यांचे खाजगी सचिव
१०) मा.राज्यमंत्री (वने) यांचे खाजगी सचिव
११) सचिव (वने) यांचे स्वीय सहाय्यक
१२) वन विभागातील सर्व कार्यासने
१३) निवडनस्ती / फ-८ / ४